**ज्येष्ठ साहित्यिक/गायक/संगीतकार पु.ल. देशपांडे, ग. दि. माडगुळकर व सुधीर फडके यांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्ताने सांस्कृतिक कार्यक्रमाच्या आयोजनाच्या जाहिरात खर्चास मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग**
**शासन निर्णय क्र. संकीर्ण - ८२१८ /प्र. क्र. २५७ /सां.का.४**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ८ जानेवारी, २०१९

वाचा :- १) शासन निर्णय, पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग क्र. संकीर्ण - ८२१८ /प्र. क्र. २५७ /सां.का.४ दिनांक ६ डिसेंबर, २०१८ व दिनांक १४ डिसेंबर, २०१८
२) ज्ञापन, मराठी भाषा विभाग, क्र.संकीर्ण-२०१८/प्र.क्र.१७/२०१८/भाषा-३, दि.२७ सप्टेंबर, २०१८
३) संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालयाचे दिनांक १३ डिसेंबर,२०१८ रोजीचे पत्र

**प्रस्तावना :-**

ज्येष्ठ साहित्यिक/गायक/संगीतकार पु.ल. देशपांडे, ग. दि. माडगुळकर व सुधीर फडके यांच्या जन्मशताब्दी वर्षानिमित्ताने आयोजित करावयाच्या विविध कार्यक्रमांना उपर्निर्दिष्ट संदर्भ क्र. १ येथील दिनांक ६ डिसेंबर,२०१८ व दिनांक १४ डिसेंबर, २०१८ च्या शासन निर्णयान्वये अनुक्रमे १० सांस्कृतिक कार्यक्रमांच्या खर्चास व सदर कार्यक्रम सादर करण्याऱ्या संस्थांना मान्यता देण्यात आलेली आहे. या कार्यक्रमांच्या कार्यक्रम निमंत्रण पत्रिका-डिझाईन बँकड्रॉप, बोर्ड, बँनर, होर्डीग्ज-डिझाईन वर्तमान पत्रातील जाहिरात-डिझाईन खर्चास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. या संदर्भात शासनाने खालील प्रमाणे निर्णय घेतलेला आहे.

**शासन निर्णय :-**

ख्यातनाम लेखक, नाटय व चित्रपट अभिनेते पु.ल. देशपांडे, विख्यात कवी, पटकथा, संवाद लेखक व गीतकार ग.दि.माडगूळकर व जेष्ठ संगीतकार गायक सुधीर फडके यांच्या सन २०१८-१९ या जन्मशताब्दी वर्षा निमित्त आयोजित करावयाच्या १० सांस्कृतिक कार्यक्रमाच्या प्रसिध्दीमध्ये सुसूत्रता रहावी या करीता खालील बाबींवर खर्च करण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | खर्चाचा तपशिल | रक्कम |
|---|---|---|
| १ | कार्यक्रम निमंत्रण पत्रिका-डिझाईन बँकड्रॉप, बोर्ड, बँनर, होर्डीग्ज-डिझाईन वर्तमान पत्रातील जाहिरात-डिझाईन | रु. ५०,०००/- |
| | एकूण | रु. ५०,०००/- |

२ यावर होणारा खर्च, मागणी क्रमांक झेडएफ-०१, मुख्य लेखाशिर्ष २०५२ सचिवालय-सर्वसाधारण सेवा,०९०, सचिवालय,(००) (०४) मराठी भाषेच्या प्रचार व प्रसारासाठी हाती घ्यावयाचे उपक्रम ( कार्यक्रम)(२०५२ ५२३२) ५० इतर खर्च या लेखाशिर्षाखाली सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात मंजूर केलेल्या तरतूदीतून भागविण्यात यावा.

३. सदर प्रकरणी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना नियंत्रण अधिकारी तसेच लेखाधिकारी, सांस्कृतिक कार्य संचालनालय यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

४. शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन निर्णय क्र. विअप्र-२०१३/विनियम, दिनांक १७ एप्रिल, २०१५, वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग-पहिला, उपविभाग-तीन, अ.क्र.४ परिच्छेद क्र. २७ (२) (अ) अन्वये प्रशासकीय विभागास प्राप्त अधिकारानुसार मंजूर करण्यात येत आहे.

५. सदर प्रकरणी वित्त विभागाच्या शासन परिपत्रक दिनांक २ एप्रिल, २०१८ मधील सर्व परिच्छेद व परिशिष्टातील अटी या प्रकरणी लागू होतात किंवा कसे याबाबतची पडताळणी करण्याची जबाबदारी संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई यांची राहील.

६. वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या निधीमधून विभागास खर्च करण्याच्या अधिकारानुसार सदर खर्च मंजूर करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१९०११०१५०९५१५८२३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Digitally signed by Vilas Ramrao Thorat
Date: 2019.01.10 15:22:15 +05'30'

**( विलास रा. थोरात )**
शासनाचे उप सचिव

**प्रति,**

१. मा.मंत्री (सांस्कृतिक कार्य) यांचे विशेष कार्य अधिकारी, मंत्रालय, मुंबई ३२
२. प्रधान सचिव (सांस्कृतिक कार्य विभाग) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ३२
३. सह सचिव, मराठी भाषा विभाग, मंत्रालय, मुंबई ३२ यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई

४. उप सचिव (सां.का.४), पर्यटन व सांस्कृतिक कार्य विभाग यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई ३२
५. संचालक, सांस्कृतिक कार्य संचालनालय, मुंबई
६. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
७. महालेखापाल, १/२ मुंबई/नागपूर (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र राज्य
८. महालेखापाल, १/२ मुंबई/नागपूर ( लेखा परीक्षा ) महाराष्ट्र राज्य
९. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
१०.निवड नस्ती, सां.का.४